**नाशिक येथील वाहन निरीक्षण व परिक्षण केंद्र (I & C Centre) चालविण्याबाबतच्या खर्चास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०११९/प्र.क्र.१७/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : १६ फेब्रुवारी २०२३.

वाचा : -

१) गृह विभाग, शासन ज्ञापन क्र. एमव्हीआर-०५१७/प्र.क्र.२४७/परि-२, दि.२८.०३.२०१८.
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. एमव्हीडी-०११९/प्र.क्र.१७/परि-४, दि.०२.११.२०१९, समक्रमांक शासन निर्णय दि. १८.१२.२०२० व समक्रमांक शासन निर्णय दि. २५.०४.२०२२.
३) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. वानिता(१५)/०४१४/ न.क्र.०४/का-१०(१) /जा.क्र.१३६८९, दि.०९.१२.२०२२.

प्रस्तावना :-

उपर्निर्दिष्ट क्र. ३ येथील परिवहन आयुक्त कार्यालयाच्या प्रस्तावानुसार प्रादेशिक परिवहन अधिकारी, नाशिक यांच्यामार्फत मे.रोजमार्टा टेक्नॉलॉजीस लिमिटेड यांनी दि.०१.०८.२०२१ ते दि. ३१.०७.२०२२ या कालावधीत नाशिक येथील वाहन निरीक्षण व परिक्षण केंद्र (I & C Centre) चालविल्याबाबत रु. ३२,७०,३७०/- इतक्या रुपयांचे देयक सादर केले आहे. तथापि, वाहन निरीक्षण व परिक्षण केंद्राचे सदर कालावधीतील रु.१२,६५,७७९/- इतक्या रकमेची वीजेचे बील, दूरध्वनीची देयके व इतर खर्चाची देयके अदा करण्यास सेवापुरवठादार मे.रोजमार्टा टेक्नॉलॉजी लिमिटेड यांनी नकार दिल्याने, सदर देयके प्रादेशिक परिवहन कार्यालय, नाशिक यांनी अदा केले असल्याने सदरहू रक्कम वजाती करता उर्वरीत रु.२०,०४,५९१/- इतकी रक्कम मे.रोजमार्टा टेक्नॉलॉजीस लिमिटेड यांना अदा करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

दि.०१.०८.२०२१ ते दि.३१.०७.२०२२ या कालावधीत नाशिक येथील वाहन निरीक्षण व परिक्षण केंद्र ( I & C Centre) चालविल्याबाबत मे.रोजमार्टा टेक्नॉलॉजीस लिमीटेड यांना एकूण रु.२०,०४,५९१/- (अक्षरी रुपये वीस लक्ष चार हजार पाचशे एक्क्यान्नव फक्त) अदा करण्यास कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

२.  यासाठी येणारा खर्च "मागणी क्र. बी-३, २०४१ वाहनांवरील कर, (०२) प्रादेशिक कार्यालय, (०२) (०१) प्रादेशिक कार्यालय दत्तमत (अनिवार्य) (२०४१ ००३६) १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३.  सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उप विभाग-चार, अनुक्रमांक ११ अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०२१६१८२७२५२४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LANGHI BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2023.02.17 14:55:49 +05'30'

**(भरत रा. लांघी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर.
२) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) परिवहन उप आयुक्त (प्रशासन/निरीक्षण/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई.
४) प्रादेशिक परिवहन अधिकारी, नाशिक.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
६) कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवडनस्ती (परि-४).